**महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या., मुंबई यांच्या आस्थापनेवरील नियमित कर्मचारी यांना भारत सरकारचा उपदान प्रदान अधिनियम-१९७२ आणि महाराष्ट्र शासनाचा उपदान प्रदान (महाराष्ट्र) नियम १९७२ लागू करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. पीएचसी-०४१३/प्र.क्र.१०४/पोल-७,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २२ फेब्रुवारी, २०१७.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या., वरळी, मुंबई येथील नियमित कर्मचाऱ्यांना भारत सरकारच्या उपदान प्रदान अधिनियम, १९७२ व महाराष्ट्र शासनाचा उपदान प्रदान (महाराष्ट्र) नियम १९७२ यामधील तरतुदी लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या., वरळी, मुंबई यांच्या आस्थापनेवरील नियमित कर्मचारी यांना भारत सरकारचा उपदान प्रदान अधिनियम-१९७२ आणि महाराष्ट्र शासनाचा उपदान प्रदान (महाराष्ट्र) नियम १९७२ पुढील अटींच्या अधीन लागू करण्यात येत आहे:-

१) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ यामधील कर्मचाऱ्यांकरिता सेवानिवृत्ती उपदान व मृत्यू उपदान यांच्यावरील कमाल मर्यादा रु.०७.०० लक्ष (रु. सात लक्ष) इतकी राहील.

२) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळातील कर्मचारी यांना उपदानाची रक्कम ही पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ यांनी स्वत:च्या निधीमधून रु.७.०० लक्ष च्या मर्यादेमध्ये देय राहील. याबाबत शासनाकडून कोणतेही दायीत्व देणार नाही.

३. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७५/साऊ, दिनांक ०१.०७.२०१६ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०२१४५३०१९६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.03.02 14:54:06 +05'30'

**( स्वप्नील गोपाल बोरसे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. व्यवस्थापकीय महासंचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी, मुंबई.
३. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/अहमदनगर.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई.
५. कार्यासन (व्यय-७/विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. कार्यासन (साऊ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती (पोल-७), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.